**संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, मुंबई यांचे अधिपत्याखालील व्यवस्थापक, मोठी मुद्रणालये, सामान्य राज्य सेवा गट “अ” या पदावरील सरळसेवेने नियुक्ती....**
**श्री. कांबळे अशोक यादव (बदललेले नांव श्री. दुधगांवकर अशोक यादवराव) (अ. जा.) (राखीव पदासाठी)**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-मलोआ-२०१५/प्र.क्र. ६४/उद्योग-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक १६ ऑक्टोबर, २०१५

**वाचा** :- १) कक्ष अधिकारी, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्रमांक ९५०/३८५१/आठ, दिनांक ११/२/२०१५
२) सहायक पोलिस आयुक्त, वि. शा. -२, पोलिस आयक्त, पुणे शहर, पुणे यांचे प्रमाणपत्र क्रमांक वि.शा./पडताळणी/जीपी/१५७९/२०१५, दिनांक २९/७/२०१५

**शासन निर्णय,**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या दिनांक ११/२/२०१५ रोजीच्या पत्रान्वये शिफारस केल्यानुसार श्री. कांबळे अशोक यादव (बदललेले नांव श्री. दुधगांवकर अशोक यादवराव) (अ. जा.) (राखीव पदासाठी) यांची व्यवस्थापक, मोठी मुद्रणालये, सामान्य राज्य सेवा गट-अ, वेतनश्रेणी रुपये १५,६००-३९,१००, ग्रेड पे रु. ६,६००/- व नियमानुसार त्यावर प्राप्त होणारा महागाई भत्ता व इतर भत्ते या वेतनश्रेणीतील पदावर नेमणूक करण्यात येत आहे. त्यानुसार त्यांची पदस्थापना, “व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर” या पदावर करण्यात येत आहे.

२. श्री. दुधगांवकर अशोक यादवराव यांनी सदरचे आदेश प्राप्त झाल्यापासून ३० दिवसांच्या आत संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, मुंबई यांचेकडे रुजु व्हावे व त्या पदाचा पदभार स्विकारावा, अन्यथा त्यांची नेमणुक रद्द करण्यात येईल.

३. संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, मुंबई यांनी श्री. दुधगांवकर अशोक यादवराव यांना रुजु करुन घेतल्यानंतर व पदस्थापना स्विकारल्यानंतर त्याबाबचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत. जर ते विहित कालावधीत रुजु झाले नाहीत तर तसा अहवाल पुढील कार्यवाहीसाठी शासनास पाठवावा.

४. श्री. दुधगांवकर हे ज्या दिनांकापासून पदभार स्विकारतील त्या दिनांकापासून ते पहिली दोन वर्षे परिविक्षाधीन कालावधीवर राहतील. सदरचा परिविक्षाधीन कालावधी संपल्यानंतर पहिली वेतनवाढ त्यांना देय राहील. तथापि नंतरच्या वेतनवाढी मात्र परिविक्षा कालावधी यशस्वीपणे पूर्ण झाल्यानंतर देय राहतील. श्री. दुधगांवकर यांचे परिविक्षा कालावधीतील वेतन शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार निश्चित करण्यात यावे. परिविक्षा कालावधीत त्यांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास आणि विहित वेळेत विभागीय परिक्षा उत्तीर्ण न झाल्यास आणि अशा तऱ्हेने त्यांचे काम व वर्तणूक अयोग्य आढळल्यास ते सेवेतून कमी करण्यास पात्र ठरतील.

५. त्यांना सेवेचा/पदाचा राजीनामा द्यावयाचा असेल तर त्यांनी कमीत कमी एक महिन्याची पूर्वसुचना शासनास दिली पाहिजे तसेच त्यांना सेवेतून कमी करावयाचे झाल्यास शासन एक महिन्याची पूर्वसूचना त्यांना देईल. तथापि, त्यांच्या सेवेच्या कालावधीत दुवर्तन झाल्यास वा सेवाशर्तीचा त्यांनी भंग केल्यास पूर्वसुचनेचा कालावधी विचारात न घेता त्यांना सेवेतून कमी करण्यात येईल.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ मधील नियम ११ तसेच नियम १५ (४) मध्ये दिलेल्या तरतुदीनुसार श्री. दुधगांवकर यांची वैद्यकिय तपासणी होणे आवश्यक आहे. त्यानुसार सदर पदासाठी वैद्यकीयदृष्टया पात्र असल्याचे प्रमाणपत्र ६ महिन्याचे आत दाखल करण्याच्या अधिन राहून त्यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

७. सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक- चापअ-१००८/प्र.क्र. १२४/०८/१६-अ, दिनांक ९/१/२००९ मध्ये नमुद केल्यानुसार श्री. दुधगांवकर यांच्यासंदर्भत सहायक पोलिस आयुक्त, वि. शा. -२, पोलिस आयक्त, पुणे शहर, पुणे यांचे क्रमांक वि.शा./पडताळणी/ जीपी/१५७९/२०१५, दिनांक २९/७/२०१५ अन्वये चारित्र्य प्रमाणपत्र शासनास सादर केले आहे. त्यामुळे श्री. दुधगांवकर यांची पुन्हा चारित्र्य पडताळणी करण्याची आवश्यकता नाही.

८. व्यवस्थापक, मोठी मुद्रणालये (गट-अ) या पदाचे सेवा प्रवेश नियम दिनांक ११/८/१९८८ च्या अधिसुचनेन्वये निश्चित करण्यात आले असून त्यानुसार....

१) या पदासाठी दोन वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी असेल.

२) या पदासाठी विहित केलेली विभागीय परीक्षा आणि हिंदी व मराठी भाषा परीक्षा, जर अगोदर ती व्यक्ती त्या परीक्षा उतीर्ण झालेली नसेल तर किंवा तिला त्या परीक्षा उतीर्ण होण्यापासून सूट देण्यात आली नसेल तर, याबाबतीत करण्यात आलेल्या नियमानुसार, उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

३) या पदावर नियुक्ती करण्यात आलेली व्यक्ती महाराष्ट्र राज्यात कोणत्याही ठिकाणी बदली करीता पात्र राहील.

९. श्री. दुधगांवकर यांचे विरुध्द महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ च्या नियम ८ अन्वये विभागीय चौकशी चालू असून त्यांना शासन ज्ञापन क्रमांक शिमुना-२०१३/प्र.क्र. १४३/१३/उद्योग-४, दिनांक ६/९/२०१३ अन्वये दोषारोपाचे ज्ञापन देण्यात आले आहे. त्यामुळे त्यांची वरीष्ठ पदावर सरळसेवेने निवड झाली असली तरी व्यवस्थापक, मोठी मुद्रणालये, सामान्य राज्य सेवा गट-अ या वरीष्ठ पदावरील नियुक्ती ही तात्पुरत्या स्वरुपाची व विभागीय चौकशीच्या निर्णयाच्या अधीन राहून असेल, तसेच प्रलंबित विभागीय चौकशीमध्ये श्री. दुधगांवकर दोषी आढळून आल्यास त्यांची वरिष्ठ पदावरील नियुक्ती रद्द करण्याचा अधिकार शासनास राहील, तसेच विभागीय चौकशीमध्ये त्यांना कोणतीही शिक्षा झाल्यास सदरची शिक्षा वरीष्ठ पदावर उपभोगण्यास ते तयार असतील, असे त्यांच्याकडून संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, मुंबई यांनी हमीपत्र घ्यावे, या अटींच्या अधीन राहून त्यांना नियुक्ती देण्यात यावी.

१०.  श्री. दुधगांवकर हे सध्या शासन सेवेत कार्यरत असल्याने त्यांना त्यांच्या पुर्वीच्या सेवा जोडून देणे, तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू करण्याबाबतचे आदेश, श्री. दुधगांवकर यांनी संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामुग्री संचालनालय, मुंबई यांचेमार्फत शासनास प्रस्ताव सादर केल्यानंतर वेगळ्याने यथावकाश निर्गमित करण्यात येतील.

१०.  सदरचे आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ६७१/का-१२, दिनांक २१/४/२०१५ व क्रमांक ३६/१६-अ, दिनांक ५/५/२०१५ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहेत.

११.  सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात येत असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१५१०१६१५५८२५३६१० असा आहे. सदरचे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vaijnath Bhujangrao Latake

Digitally signed by Vaijnath Bhujangrao Latake
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8502d8fbaa5d3d31358e5bf349fc085301 9893b61049b2ad260bccf75c596136, cn=Vaijnath Bhujangrao Latake
Date: 2015.10.16 16:03:41 +05'30'

**(वै. भू. लटके)**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१) संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई
२) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, वाई , जिल्हा सातारा.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
५) सह सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा,
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
८) श्री. दुधगांवकर अशोक यादवराव, व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, वाई, जिल्हा सातारा.
९) निवड नस्ती, उद्योग-४